**पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत संशोधन सहायकांना महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २४.२.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सुधारीत वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मप्रन्या/१०११/(६९/२०११)/आ(संनि)**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ४ था मजला,

नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१

तारीख: २९ नोव्हेंबर, २०१४.

वाचा

**शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेपूर-१२०१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.२७.२.२००६.**

प्रस्तावना

जलसंपदा विभागांतर्गत मेरी, नाशिक व पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत संशोधन सहाय्यक ही पदे कार्यरत आहेत सदर पदांचे सेवाप्रवेश नियम व कर्तव्य जबाबदाऱ्या समान आहेत. जलसंपदा विभागातील संशोधन सहाय्यक व कनिष्ठ वैज्ञानिक सहाय्यक या पदाची सेवाप्रवेश नियमानुसार शैक्षणिक अर्हता किमान बी.एस.सी. अशी आहे. त्यामुळे या पदास केंद्राच्या धोरणानुसार पाचव्या वेतन आयोगात रू. ५०००-८००० वेतनश्रेणी अनुज्ञेय आहे. त्याबाबतचा प्रस्ताव तत्कालीन वेतनत्रुटी निवारण समितीसमोर सादर करण्यात आला होता. त्यानुसार मेरी, नाशिक येथील संशोधन सहाय्यक या पदास वित्त विभागाच्या दिनांक २७.२.२००६ च्या शासन निर्णयान्वये पाचव्या वेतन आयोगात रू.५०००-१२५-८००० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली. त्यामुळे पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयांतर्गत कार्यरत असणारे सर्वश्री एस.एम.कदम व एस.डी.घुगे, संशोधन सहाय्यक या कर्मचाऱ्यांनी सदर कार्यालयातील संशोधन सहाय्यक पदास रू.५०००-८००० ही वेतनश्रेणी लागू करण्याबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ येथे मूळ अर्ज क्रमांक- २११/२०११ दाखल केला होता.

२. सदर मूळ अर्ज क्र.२११/२०११ संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने, विभागांतर्गत मेरी, नाशिक व पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत समकक्ष पदांच्या वेतनश्रेणीत तफावत दिसून येत असल्याने, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालयातील संशोधन सहाय्यक या पदास रू.५०००-८००० ही वेतनश्रेणी लागू करण्याबाबत दि. २४/०२/२०१२ रोजी निर्णय दिला. मा.न्यायाधिकरणाच्या प्रस्तुत दिनांक २४/०२/२०१२ च्या आदेशासंदर्भात शासनाने मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक- ८१११ /२०१२

संदर्भातील मा. उच्च न्यायालयाच्या दिनांक ३०/४/२०१४ च्या आदेशान्वये मा.प्रशासकीय न्यायाधिकारणाचे दि.२४.०२.२०१२ चे आदेश कायम केले आहेत व शासनाची याचिका खारीज केली आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात स्पेशल लिव्ह टू अपील (सिव्हील) दाखल करण्याबाबत विधी व न्याय विभागाचे अभिप्राय घेतले असता, सदर याचिका अपील करणे योग्य नसल्याचे अभिप्राय विधि व न्याय विभागाने दिले.

३. दरम्यान सर्वश्री एस.एस.कदम व एस.डी.घुगे यांनी मा. न्यायाधिकरणाच्या दि.२४.०२.२०१२ च्या आदेशाची अंमलबजावणी न केल्याबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ येथे अवमान याचिका दाखल करण्यासाठी संकीर्ण अर्ज क्र.३१२/२०१२ दाखल केला आहे. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ यांनी मूळ अर्ज क्र.२११/२०११ संदर्भात पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालयातील संशोधन सहाय्यक या पदास रू.५०००-८००० ही वेतनश्रेणी लागू करण्याबाबत दिनांक- २४/०२/२०१२ रोजी दिलेल्या आदेशाची अंमलबजावणी करण्यास दिनांक ३०.११.२०१४ पर्यन्त अंतिम मुदत देऊन केलेल्या कार्यवाहीबाबत मूळ अर्जदारांस कळविण्याचे आदेश दिनांक २८.१०.२०१४ रोजी दिले आहेत. त्यामुळे पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत संशोधन सहाय्यक या पदास दिनांक ०१.०१.१९९६ पासून रुपये ५०००-१२५-८००० ही वेतनश्रेणी वित्त विभागाच्या दिनांक २७.०२.२००६ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून देण्यासंबंधीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ यांनी दि. २४/०२/२०१२ रोजी दिलेल्या निर्णयानुसार पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत संशोधन सहाय्यक या पदास वित्त विभागाच्या दिनांक २७.०२.२००६ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून, दिनांक ०१.०१.१९९६ पासून रू.५०००-१२५-८००० ही वेतनश्रेणी लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संबंधित संशोधक सहायकांचे दिनांक १.१.१९९६ रोजी असुधारित वेतनश्रेणीतून आता मंजूर करण्यात येत असलेल्या सुधारित वेतनश्रेणीत काल्पनिकरित्या वेतन निश्चित करण्यात यावे. त्यानंतर दिनांक ३१.३.२००६ पर्यन्तच्या संबंधितांच्या वार्षिक वेतनवाढी काल्पनिकरित्या विचारात घेऊन

प्रत्यक्षात दिनांक १.४.२००६ पासून वेतननिश्चितीचा लाभ संबंधितांना अनुज्ञेय करण्यात यावा. त्यानुसार त्यांना देय होणारी थकबाकी संबंधितांकडून बंधपत्र घेऊन अदा करण्यात यावी.

२. सुधारित वेतनश्रेणीत वेतननिश्चितीसाठी द्यावयाचा विकल्प संबंधीत लाभार्थ्यांना द्यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीनुसार व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३२/२०/१४/ सेवा-९, दिनांक १६/१०/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२९१५२४४९४२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mugdha Nitin Dhuri

Digitally signed by Mugdha Nitin Dhuri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mugdha Nitin Dhuri
Date: 2014.12.01 11:04:42 +05'30'

(मु. नि. धुरी)

अवर सचिव,जलसंपदा विभाग

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२) महालेखापाल - १/२ , (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.

३) अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे. यांना मा.न्यायाधिकरणाच्या आदेशास अनुसरून पुढील कार्यवाहीसाठी अग्रेषित.

४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.

६) सचिव(जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई.

८) आ(संनि) कार्यासन संग्रहार्थ.